महत्वाचे/कालमर्यादा

**माहितीच्या अधिकारा संदर्भात केंद्र शासनाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार पूर्व तयारी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक, क्रमांक : केमाअ-२००५/प्र.क्र.१९०/०५/५,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक.:०६/०८/२००५

परिपत्रक :-

माहिती अधिकारासंदर्भातील केंद्र शासनाच्या माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ च्या संदर्भातील विधेयकास मा.राष्ट्रपती महोदयांनी दिनांक १५.६.२००५ रोजी अनुसंमती दिली असून त्यासंदर्भातील अधिनियम केंद्र शासनाच्या दिनांक २१ जून,२००५ च्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आला आहे. **या संदर्भात केंद्र शासनाच्या दिनांक २६ मे, २००५ च्या पत्रात नमूद बाबींवरील कार्यवाही करण्याबाबत सविस्तर सूचना यापूर्वीच दिनांक १८/६/२००५च्या परिपत्रक, क्रमांक : केमाअ-२००५/प्र.क्र.१९०/०५/०५ अन्वये सर्व संबंधितांना देण्यात आल्या आहेत.** या अधिनियमातील तरतूदीनुसार काही बाबींवर १०० /१२० दिवसाच्या आत कार्यवाही पूर्ण करणे आवश्यक आहे. सदरचा अधिनियम राज्य शासनाच्या विधी व न्याय विभागाकडून दिनांक २१ जुलै,२००५ च्या राज्य शासनाच्या राजपत्रात पुन्हा प्रसिध्द केला आहे. **सदरच्या राजपत्राची प्रत माहितीस्तव व योग्य त्या तात्काळ कार्यवाहीस्तव सोबत पाठविण्यात येत आहे.**

२. **या अधिनियमातील कलम १ (३) नुसार सदर अधिनियमातील कलम ४ (१), कलम ५ (१) व (२), कलम १२,१३,१५,१६,२४,२७ व २८ या मधील तरतूदी दिनांक १५ जून,२००५ पासून अमलात आल्या असून उर्वरित तरतूदी दिनांक १५ जून,२००५ पासून १२० दिवसांनी म्हणजेच दिनांक १२ ऑक्टोबर, २००५ पासून अमलात येणार आहेत.**

३. या अधिनियमातील उपरोक्त परिच्छेदात नमूद केलेल्या तरतूदी दिनांक १५ जून,२००५ पासून अमलात आल्या आहेत. तसेच उर्वरित सर्व तरतूदी दिनांक १२ ऑक्टोबर, २००५ पासून अमलात येणार असल्याने खालील बाबींवरील कार्यवाही १००/१२० दिवसाच्या आत पूर्ण करणे बंधनकारक आहे :-

**१) अधिनियमातील कलम ४ (१) (अ) मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करुन कार्यालयीन कागदपत्र तालिकाबध्द व सूचीबध्द करणे**

**२) अधिनियमातील कलम ४ (१) (ब) नुसार कार्यवाही करुन विविध प्रकारच्या १७ बाबींवरील माहिती प्रसिध्द करणे.**

३) **अधिनियमातील कलम ५ नुसार दिनांक १५ जुन २००५ पासून १०० दिवसाच्या आत म्हणजे दिनांक २२-९-२००५ पुर्वी "शासकीय माहिती अधिकारी " व "सहायक शासकीय माहिती अधिकारी " पदनिर्देशित करणे.**

४) **"अपिलीय प्राधिकारी" पदनिर्देशित करणे. (१०० दिवसांच्या आत)**

५) **राज्य शासनाच्या ज्या अधिनियम, नियम, सूचना, इ. मधील तरतुदी केंद्रशासनाच्या अधिनियमातील तरतुदींशी विसंगत आहेत त्या नियम, अधिनियम, सूचनांमध्ये सुधारणा करणे.**

४. बाब क्रमांक २ मध्ये नमूद करण्यात आलेल्या विविध प्रकारच्या १७ बाबींवरील माहिती संदर्भात, केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या दिनांक २६.५.२००५ च्या पत्रातील सूचनांनुसार या १७ मुद्यांबाबतची आवश्यक ती कार्यवाही पूर्ण करुन **सदरची माहिती केंद्र शासनाचा अधिनियम लागू झाल्यानंतर १२० दिवसांच्या आंत प्रसिध्द करण्याची सर्व शासकीय प्राधिकरणांनी दक्षता घ्यावयाची आहे.** तेव्हा उक्त विविध प्रकारची १७ बाबीवरील माहिती प्रसिद्ध करणे व ती इंटरनेटवर तसेच अन्य माध्यमाद्वारे जनतेस सुलभपणे उपलब्ध होईल अशी व्यवस्था करणे आगत्याचे आहे.

५. बाब क्रमांक ३ व ४ च्या संदर्भात असे सूचित करण्यात येते की, राज्य शासनाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सर्व कार्यालयांनी "शासकीय माहिती अधिकाऱ्यांची व अपिलीय प्राधिका-यांची" नियुक्ती यापूर्वीच केलेली आहे. या सर्व कार्यालयांनी सदरच्या नियुक्त्या आता केंद्र शासनाच्या अधिनियमातील कलम ५(१) नुसार करण्यात येत असल्याचे आदेश काढण्याची तसेच या अधिनियमातील कलम ५ (२) नुसार "सहायक शासकीय माहिती अधिकारी" यांच्या नियुक्त्या सुध्दा करण्याबाबतची कार्यवाही तातडीने पूर्ण करावी लागेल. तसेच आता केंद्र शासनाच्या अधिनियमातील तरतुदींमुळे जी कार्यालये नव्याने या अधिनियमाच्या कक्षेत समाविष्ट होणार आहेत त्यांनी शासकीय माहिती अधिकारी, सहायक शासकीय माहिती अधिकारी व अपिलीय प्राधिका-यांच्या नियुक्त्या करणे आवश्यक आहे. **या सर्व नियुक्त्या करण्यासंदर्भातील कार्यवाही सर्व सक्षम प्राधिकाऱ्यांनी विहित कालमर्यादेच्या कालावधीत प्राथम्याने पूर्ण करावी** व त्याबाबतची माहिती शासनास संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फतआणि जी प्राधिकरणे इ. जिल्हाधिकारी यांच्याशी थेट संबंधित नाहीत त्यांनी संबंधित प्रशासकीय विभागांमार्फत सादर करावी. जिल्हाधिकारी, प्रशासकीय विभाग व सक्षम प्राधिकारी यांनी सदर माहिती संकलित करून फ्लॉपीसह शासनाकडे पाठविण्याची व्यवस्था करावी. तसेच मंत्रालयीन स्तराची माहिती या विभागाकडे पाठविण्याची व्यवस्था करावी. या अधिनियमातील तरतुदीनुसार पदनिर्देशित करण्यात आलेल्या सर्व राज्य सहाय्यक शासकीय माहिती अधिकारी, राज्य शासकीय माहिती अधिकारी व अपिलीय प्राधिकारी यांची सविस्तर यादी संबधित अधिका-यांचे पत्ते व दूरध्वनि क्रमांकासह त्या त्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाच्या वेबसाईटवर न चुकता प्रसिध्द करावी.

६. बाब क्र.५ च्या संदर्भात असे कळविण्यात येते की, राज्य शासनाच्या ज्या अधिनियम, नियम इ. मध्ये ज्या तरतुदी केंद्रशासनाच्या अधिनियमातील तरतुदीस विसंगत असतील त्या अधिनियम, नियम, इ. मध्ये तात्काळ सुधारणा करण्याची कार्यवाही सर्व मंत्रालयीन विभागांनी विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने या परिपत्रकाच्या **तारखेपासून ३० दिवसाच्या आत पूर्ण करावी.** सर्व मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय

नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालये, निमशासकीय कार्यालये, स्थानिक स्वराज्य संस्था, इत्यादी तसेच राज्य शासनाकडून ज्या स्वायत्त संस्था, मंडळे, महामंडळे, कंपन्या, इत्यादींना अर्थ सहाय्य करण्यात येते त्या सर्व कार्यालयांकडून केंद्र शासनाच्या सूचनेनुसार आवश्यक ती कार्यवाही पूर्ण करून घेण्याची जबाबदारी संबंधित मंत्रालयीन विभागाची राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

**स्वाक्षरी/-**

(आर. एम.प्रेमकुमार)
शासनाचे मुख्य सचिव

**<u>सोबत :- केंद्र शासनाच्या अधिनियमाची प्रत</u>**

प्रत,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
*७) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*८) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
*९) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
*१०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
*११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*१२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
*१३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) सर्व मंत्रालयीन विभाग,
१७) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१८) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१९) आयुक्त सर्व महानगरपालिका

निवड नस्ती. (२ प्रती) * (पत्राने)

-------